## . . महालक्ष्मीची आरती . .

जय देवी जय देवी जय श्री लक्ष्मी माते
प्रसन्न होऊनि आता वर दे आम्हाते... जय देवी जय देवी धृ0

श्रीविष्णुकान्ते तव विश्वावरि सत्ता
स्थिरचर दौलत देशी लक्ष्मी व्रत करिता ...जय देवी जय देवी ... 1

जननी तुज ऐसी या नाही त्रिभुवनी
सुरवर वंदिती मस्तक ठेवुनि तव चरणी ... जय देवी जय देवी ...2

कृपा प्रसादे तुझिया लाभे सुखशांती
चिंता क्लेशहि जाती नुरते आपत्ती ... जय देवी जय देवी ...3

वैभव ऐश्वर्याचे आणि अपार द्रव्याचे
देसी दान दयाळे सदैव सौख्याचे ... जय देवी जय देवी ...4

यास्तव मिलिंद माधव आरति ओवाळी
प्रेमे भक्ति भावे लोटांगण घाली ... जय देवी जय देवी ...4